# आरुणिकोपनिषद्

## मूळ संस्कृत संहिता, मराठी अनुवाद, आवश्यक टीपांसह


संपादक व अनुवादक

डॉ. नीलेश जोशी

M.A. Sanskrit, NET, SET, Ph.D. व्याकरणशास्त्री




# आरुणिकोपनिषद्

मूळ संस्कृत संहिता, मराठी अनुवाद, आवश्यक टीपांसह


संपादक व अनुवादक

डॉ. नीलेश जोशी

M.A. Sanskrit, NET, SET, Ph.D. व्याकरणशास्त्री






eBook Publication Pvt. Ltd.®

प्रथमावृत्ती : जुलै २०१६

# आरुणिकोपनिषद्

**मूळ संस्कृत संहिता, मराठी अनुवाद, आवश्यक टीपांसह**

**संपादक व अनुवादक : डॉ. नीलेश जोशी,**

**वरिष्ठ भाषाशास्त्रज्ञ, IIT मुंबई,**

**पवई, महाराष्ट्र ४०००७६**

**प्रथमावृत्ती : गुरु पौर्णिमा, १९ जुलै २०१६**

**प्रकाशक:**

**eBook Publication Pvt. Ltd.®**

4/47, उदय को. हौ. सोसायटी,

आरे रोड, गोरेगाव पश्चिम,

मुंबई, महाराष्ट्र, भारत, ४०००६२

**Telephone:** +91 7038164022

**Email:** publicationebook@gmail.com

**Website:** https://archive.org/details/@ebook_publcation

# eBook Terms & Conditions

## 1. This eBook* may be

a. Distributed without modification or sale.

b. Copied for personal and educational use.

c. Printed for personal and educational use.

## 2. This eBook* may NOT be

a. Sold individually or as part of package.

b. Modified in any way.

c. Reversed-engineered.



***eBook refers to this PDF and any of its content including pages and images in either electronic or printed form.**

## संपादकीय

**॥ मङ्गलाचरणम् ॥**

**आरुणिकोपनिषद्वेद्यपदतत्त्वस्वरूपकम् ।**

**पारमैश्वर्यविभवं रामचन्द्रपदं भजे ॥**

आरुणिकोपनिषदाद्वारे जाणण्यास योग्य, पदतत्त्व स्वरूप, पारमैश्वर्याच्या वैभवाने संपन्न रामचंद्रपदाचे मी सेवन, भजन करतो.

हे उपनिषद पाच खंडात विभागले असून अरुणपुत्र आरुणी व ब्रह्मदेव यांच्यातील संवाद आहे. आरुणी यांनी ब्रह्मदेवांना अखिल कर्मत्यागाचा मार्ग विचारला आहे. तेव्हा ब्रह्मदेव सांगतात की, पुत्र, भाऊबंद अगदी ब्रह्मांडाचाही त्याग करावा. तिन्ही आश्रमी व्यक्तींनी अग्निहोत्राचे अग्नी धारण करून यज्ञोपवीत, कुश, दंड व लोकांचा त्याग करून औषधाप्रमाणे अन्न ग्रहण करून तिन्ही संध्यांच्या पूर्वी स्नान करून परमात्म्याचे अनुष्ठान करावे. येथे यज्ञोपवीत त्यागण्याचा विधी स्पष्ट केला आहे. ब्रह्मचारीपूर्वक राहताना कमंडलू ग्रहण, काम, क्रोध इत्यादींचा त्याग करण्यास सांगून निवासाचे नियम स्पष्ट केले आहेत. थोडक्यात निर्वाणाचे शास्त्रनियम सांगितले आहेत.

**eBook Publication Pvt. Ltd.®** या पुस्तकाचे प्रकाशन करण्याचे मान्य केले त्याबद्दल मी त्यांचा विशेष आभारी आहे. वाचकांना हे छोटेखानी अप्रसिद्ध उपनिषद आवडेल, अशी आशा व्यक्त करतो. बाकी यशापयशबद्दलच्या अवघ्या आशा श्रीरामार्पण !!

**डॉ.नीलेश जोशी**

**गुरु पौर्णिमा, १९ जुलै २०१६**

# आरुणिकोपनिषत्

---

॥ मङ्गलाचरणम् ॥

**आरुणिकोपनिषद्वेद्यपदतत्त्वस्वरूपकम् ।**

**पारमैश्वर्यविभवं रामचन्द्रपदं भजे ॥**

आरुणिकोपनिषदाद्वारे जाणण्यास योग्य, पदतत्त्व स्वरूप, पारमैश्वर्याच्या वैभवाने संपन्न रामचंद्रपदाचे मी सेवन, भजन करतो.

॥ शान्तिपाठः ॥

**ॐ आप्यायन्तु मामाङ्गानि वाक्प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिन्द्रियाणि च ॥ सर्वाणि सर्वं ब्रह्मोपनिषदं माहं ब्रह्म निराकुर्यां मा मा ब्रह्म निराकरोदनिराकरणमस्त्वनिराकरणं मेस्तु तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ॥**

हे परब्रह्म, परमात्मा ! माझी अंगे, वाणी, प्राण, डोळे, कान, सगळी इंद्रिये आणि शक्ती परिपुष्ट होवोत. उपनिषदांमध्ये प्रतिपादन केलेले सर्वस्वरूप ब्रह्माचा मी अस्वीकार करू नये आणि त्या ब्रह्माने माझा कधीही परित्याग करू नये. त्याचे माझ्याशी अतूट संबंध राहोत. माझ्याशी अतूट संबंध राहोत. उपनिषदांमध्ये प्रतिपादन केलेला धर्म जो परमात्म्यामध्ये निरत असतो, तो माझ्यामध्ये निरंतर राहोत, तो माझ्यामध्ये निरंतर राहोत.

**ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥**

===

॥ प्रथमः खण्डः ॥

**ॐ आरुणिः प्रजापतेर्लोकं जगाम । तं गत्वोवाच । केन भगवन्कर्माण्यशेषतो विसृजामीति । तं होवाच प्रजापतिस्तव पुत्रान्भ्रातॄन्बन्ध्वादीञ्छिखां यज्ञोपवीतं यागं सूत्रं स्वाध्यायं च भूर्लोकभुवर्लोकस्वर्लोकमहर्लोकजनोलोकतपोलोकसत्यलोकं चातलतलातलवितलसुतलरसातलमहातलपातालं ब्रह्माण्डं च विसृजेत् । दण्डमाच्छादनं चैव कौपीनं च परिग्रहेत् । शेषं विसृजेदिति ॥ १ ॥**

अरुण पुत्र आरुणी ब्रह्मलोकात जाऊन ब्रह्मदेवास म्हणाले, " हे भगवन् ! मी कसे बरे सगळया कर्मांचा त्याग करू शकेन ?"

ब्रह्मदेव म्हणाले, "पुत्र, भाऊबंद इत्यादी, शिखा, यज्ञोपवीत, यज्ञ, स्वाध्याय, भूलोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक, सत्यलोक, तसेच अतल, पातळ, वितल, सुतल, रसातल, तलातल, महातल अशा प्रकारे संपूर्ण ब्रह्मांडाचा त्याग करावा. केवळ दंड, पांघरण्यास वस्त्र, लंगोटी धारण करावी. बाकी सगळ्याचा त्याग करावा."(१)

**॥ द्वितीयः खण्डः ॥**

**गृहस्थो ब्रह्मचारी वा वानप्रस्थो वा उपवीतं भूमावप्सु वा विसृजेत् । अलौकिकाग्नीनुदराग्नौ समारोपयेत् । गायत्रीं च स्ववाचाग्नौ समारोपयेत् । कुटीचरो ब्रह्मचारी कुटुम्बं विसृजेत् । पात्रं विसृजेत् । पवित्रं विसृजेत् । दण्डाँल्लोकांश्च विसृजेदिति होवाच । अत उर्ध्वममन्त्रवदाचरेत् । ऊर्ध्वगमनं विसृजेत् । औषधवदशनमाचरेत् । त्रिसन्ध्यादौ स्नानमाचरेत् । सन्धिं समाधावात्मन्याचरेत् । सर्वेषु वेदेष्वारण्यकमावर्तयेदुपनिषदमावर्तयेदुपनिषदमावर्तयेदिति ॥ २ ॥**

गृहस्थाश्रमी असो वा ब्रह्मचारी असो वा वानप्रस्थाश्रमी असो, त्याने लौकिक अग्नीला (म्हणजे अग्निहोत्राचे तीन अग्नी) जठरामध्ये लीन करावे आणि गायत्रीस वाणीरूपी अग्नीमध्ये स्थापन करावे. यज्ञोपवीत जमिनीवर किंवा पाण्यात सोडून द्यावे. कुटीत राहणाऱ्या ब्रह्मचारी माणसाने कुटुंबास सोडून द्यावे, पात्राचा त्याग करावा, कुश त्यागावे. दंड आणि लोकांचा त्याग करावा, असे ब्रह्मदेव म्हणाले."

यानंतर मंत्रहीनाप्रमाणे आचरण करावे. ऊर्ध्वलोकात जाण्याची इच्छा करू नये. औषधाप्रमाणे (स्वादिष्टपणाचा विचार न करता आरोग्यासाठी ) अन्न ग्रहण करावे. तिन्ही संध्यांच्या पूर्वी स्नान करावे. संध्याकाळी समाधीत स्थिर होऊन परमात्म्याचे अनुष्ठान करावे. सर्व वेदांमध्ये आरण्यक ग्रंथांचे पठन करावे, उपनिषदांचे पठन करावे, उपनिषदांचे पठन करावे."(२)

**॥ तृतीयः खण्डः ॥**

**खल्वहं ब्रह्मसूत्रं सूचनात्सूत्रं ब्रह्मसूत्रमहमेव विद्वांस्त्रिवृत्सूत्रं त्यजेद्विद्वान्य एवं वेद संन्यस्तं मया संन्यस्तं मया संन्यस्तं मयेति त्रिरुक्त्वाभयं सर्वभूतेभ्यो मत्तः सर्वं प्रवर्तते । सखा मा गोपायोजः सखायोऽसीन्द्रस्य वज्रोऽसि वार्त्रघ्नः शर्म मे भव यत्पापं तन्निवारयेति । अनेन मन्त्रेण कृतं वैणवं दण्डं कौपीनं परिग्रहेदौषधवदशनमाचरेदौषधवदशनं प्राश्नीयाद्यथालाभमश्नीयात् । ब्रह्मचर्यमहिंसां चापरिग्रहं च सत्यं च यत्नेन हे रक्षते३ हे रक्षतो३ हे रक्षत इति ॥ ३ ॥**



eBook Publication Pvt. Ltd.®

खरोखर ब्रह्माला सूचित करणारे सूत्र 'ब्रह्म सूत्र मीच आहे' असे समजून यज्ञोपवीताचा त्याग करावा. आहा प्रकारे समजणारा विद्वान **संन्यस्तं मया संन्यस्तं मया संन्यस्तं मयेति** (मी संन्यास घेतला, मी संन्यास घेतला, मी संन्यास घेतला ) असे तीन वेळा म्हणून

**अभयं सर्वभूतेभ्यो मत्तः सर्वं प्रवर्तते ।**

**सखा मा गोपायोजः सखायोऽसीन्द्रस्य वज्रोऽसि**

**वार्त्रघ्नः शर्म मे भव यत्पापं तन्निवारयेति ।**

(सर्व प्राण्यांपासून अभय मिळावे. कुणालाही माझ्यापासून भय असू नये; कारण माझ्यापासून सगळे विश्व प्रवर्तित होते. हे दंड ! तू माझा मित्र आहेस, तू माझ्या ओजाची रक्षा कर. तू माझा मित्र आहेस, वृत्रासुरास मारणारे इंद्राचे वज्र आहेस. हे वज्र ! मला सुख दे. जे माझे पाप असेल, त्याचे निवारण कर.)

वरील मंत्राने अभिमंत्रित वेताचा दंड आणि लंगोटी धारण करावी; औषधाप्रमाणे भोजन करावे. औषधाप्रमाणे भोजन करावे.

ब्रह्मचर्य, अहिंसा, अपरिग्रह, व सत्य यांचे प्रयत्नपूर्वक रक्षण करावे, रक्षण करावे, रक्षण करावे." (३)

**॥ चतुर्थः खण्डः ॥**

**अथातः परमहंसपरिव्राजकानामासनशयनादिकं भूमौ ब्रह्मचारिणां मृत्पात्रं वाऽलाम्बुपात्रं दारुपात्रं वा । कामक्रोधहर्षरोषलोभमोहदम्भदर्पेच्छासूयाममत्वाहङ्कारादीनपि परित्यजेत् । वर्षासु ध्रुवशीलोऽष्टौ मासानेकाकी यतिश्चरेत् द्वावेव वा चरेद्द्वावेव वा चरेदिति ॥ ४ ॥**

आता यानंतर परमहंस परिव्राजकांसाठी जमिनीवरच आसन आणि शयन इत्यादींचे, ब्रह्मचर्यपूर्वक राहण्याचे तसेच मातीचे पात्र, दूधभोपळा अथवा लाकडाचा कमंडलू ग्रहणाचे विधान केले जात आहे.

संन्याश्याने काम, क्रोध, हर्ष, रोष, लोभ, मोह, दंभ, दर्प, असूया, ममत्व, अहंकार इत्यादींचाही त्याग करावा. वर्षा ऋतूमध्ये एका ठिकाणी स्थिर रहावे. उर्वरित आठ महिने एकट्याने वावरावे अथवा एक वा दोघांबरोबर फिरावे, दोघांनी फिरावे, दोघांनी फिरावे." (४)

**॥ पञ्चमः खण्डः ॥**

**स खल्वेवं यो विद्वान्सोपनयनादूर्ध्वमेतानि प्राग्वा त्यजेत् । पितरं पुत्रमग्न्युपवीतं कर्म कलत्रं चान्यदपीह । यतयो भिक्षार्थं ग्रामं प्रविशन्ति पाणिपात्रमुदरपात्रं वा । ॐ हि ॐ हि ॐ हीत्येतदुपनिषदं विन्यसेत् । खल्वेतदुपनिषदं विद्वान्यम् एवं वेद पालाशं बैल्वमाश्वत्थमौदुम्बरं दण्डं मौञ्जीं मेखलां यज्ञोपवीतं च त्यक्त्वा शूरो य एवं वेद । तद्विष्णोः परमं पदं सदा पश्यन्ति सूरयः । दिवीव चक्षुराततम् । तद्विप्रासो विपन्यवो जागृवांसः समिन्धते । विष्णोर्यत्परमं पदमिति । एवं निर्वाणानुशासनं वेदानुशासनं वेदानुशासनम् इत्युपनिषद् ॥ ५ ॥**

खरोखर असे जाणणारा जो विद्वान (संन्यासी होऊ इच्छितो) त्याने उपनयनानंतर किंवा पूर्वी वर सांगितल्या विधीपूर्वक आपले आई-वडील, पुत्र, अग्नी, यज्ञोपवीत, कर्म, पत्नी आणि जे काही आहे त्या सर्वांचा त्याग करावा. संन्याशाने हातांचेच पात्र बनवावे किंवा उदरासच पात्र बनवून भिक्षेसाठी गावात प्रवेश करावा. त्यावेळी **ॐ हि ॐ हि ॐ हि** या उपनिषद मंत्राचे उच्चारण करावे.

खरोखर जो हे उपनिषद जाणतो, तो विद्वान आहे. पळस, बेल, औदुंबर यांचा दंड, मुंज वनस्पतीची मेखला, यज्ञोपवीत यांचा त्याग करून जो असे जाणतो, तो शूरवीर आहे.

जे आकाशात तेजोमय सूर्यमंडलाप्रमाणे परम आकाशात प्रकाशमान विष्णूंचे परमश्रेष्ठ धाम आहे, ते विद्वान उपासक नेहमी पाहतात. साधनेत सदैव जागृत राहणारे, निष्काम उपासक त्या परमधामास अधिकच उद्दीप्त करतात, तेच विष्णूंचे परमधाम समजले जाते. (अर्थात निष्काम उपासक विष्णूंच्या परमधामास प्राप्त होतात) हेच निर्वाणाचे शास्त्रनियम आहेत, हेच वेदशास्त्रनियम आहेत आहेत." (५)

**॥ शान्तिपाठः ॥**

**ॐ आप्यायन्तु मामाङ्गानि वाक्प्राणश्चक्षुः श्रोत्रमथो बलमिन्द्रियाणि च ॥ सर्वाणि सर्वं ब्रह्मोपनिषदं माहं ब्रह्म निराकुर्यां मा मा ब्रह्म निराकरोदनिराकरणमस्त्वनिराकरणं मेस्तु तदात्मनि निरते य उपनिषत्सु धर्मास्ते मयि सन्तु ते मयि सन्तु ॥**

ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

==================================================

# आरुणिकोपनिषद्

हे उपनिषद पाच खंडात विभागले असून अरुणपुत्र आरुणी व ब्रह्मदेव यांच्यातील संवाद आहे. आरुणी यांनी ब्रह्मदेवांना अखिल कर्मत्यागाचा मार्ग विचारला आहे. तेव्हा ब्रह्मदेव सांगतात की, पुत्र, भाऊबंद अगदी ब्रह्मांडाचाही त्याग करावा. तिन्ही आश्रमी व्यक्तींनी अग्निहोत्राचे अग्नी धारण करून यज्ञोपवीत, कुश, दंड व लोकांचा त्याग करून औषधाप्रमाणे अन्न ग्रहण करून तिन्ही संध्यांच्या पूर्वी स्नान करून परमात्म्याचे अनुष्ठान करावे.

येथे यज्ञोपवीत त्यागण्याचा विधी स्पष्ट केला आहे. ब्रह्मचारीपूर्वक राहताना कमंडलू ग्रहण, काम, क्रोध इत्यादींचा त्याग करण्यास सांगून निवासाचे नियम स्पष्ट केले आहेत.

थोडक्यात निर्वाणाचे शास्त्रनियम सांगितले आहेत.

**डॉ. नीलेश जोशी**

**गुरु पौर्णिमा, १९ जुलै २०१६**

